“राज्यात महापुरुष आणि गड किल्ल्यांची नावे बिअर बार/ परवाना कक्ष /दारु विक्री केंद्र यांना न देण्याबाबत” या विषयी महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम,१९४८ मध्ये सुधारणा करण्याकरिता समिती स्थापन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्र: - एमएसए- ०५/ २०१७/ प्र.क्र.१४९/ कामगार-१०
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ०३ जून, २०१७.

प्रस्तावना :-

श्री अमरजितसिंह पंडीत व इतर विधान परिषद सदस्य यांनी उपस्थित केलेल्या लक्षवेधी सूचना क्र.१३२८ च्या अनुषंगाने विधान मंडळात चर्चा करण्यात आली. त्यावेळी मा मंत्री. (राउशु) यांनी “राज्य उत्पादन शुल्क विभागाचे मंत्री, कामगार विभागाचे मंत्री आणि सन्माननीय सदस्य श्री अमरजितसिंह पंडित आणि या सदनातील व खालच्या सदनातील काही सदस्यांना घेवून या विषयासंदर्भात कायदा करण्याच्या दृष्टीने चर्चा करुन लवकरात लवकर निर्णय घेण्यात येईल” असे आश्वासन दिले होते. या आश्वासनाच्या अनुषंगाने मा. मंत्री (राउशु) यांचेअध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीमध्ये मा.मंत्री (राउशु) यांनी मा.मंत्री (कामगार) यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्याचे निदेश दिले आहेत.सदर समितीमध्ये मा.मंत्री(राउशु) ,मा. राज्यमंत्री(कामगार), मा. राज्यमंत्री (राउशु) तसेच मा. श्री राधाकृष्ण विखे पाटील, मा. श्री जयंत पाटील, मा. श्री अतुल भातखळकर, मा. श्री जयप्रकाश मुंदडा, मा. श्री अबु आझमी, व मा. श्री अमरजीतसिंह पंडित, मा. श्री भाई जगताप, मा.डॉ. निलम गो-हे, मा. श्री जयंत पाटील विधान सभा/ विधान परिषद सदस्य आणि प्रधान सचिव (कामगार), प्रधान सचिव (राउशु), आयुक्त (राउशु) व आयुक्त (कामगार) यांचा समावेश करुन समिती गठीत करण्याचे निदेश मा.मंत्री(राउशु) यांनी दिले आहेत. त्यास अनुसरुन “ राज्यात महापुरुष आणि गड किल्ल्यांची नावे बिअर बार व दारु दुकानांना न देण्याबाबत” या विषयी कायद्यात सुधारणा करण्याकरिता समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८ मध्ये आस्थापनेचे नाव काय असावे किंवा काय असू नये याबाबत कायदेशीर तरतूद नसल्याने याबाबत अधिनियमात सुधारणा करणे आवश्यक आहे. याकरिता “राज्यात महापुरुष आणि गड किल्ल्यांची नावे बिअर बार व दारु दुकानांना न देण्याबाबत” या विषयी निर्णय घेण्याकरिता कायद्यात सुधारणा करण्याकरिता खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अध्यक्ष/ सदस्यांचे नाव | पद |
|---|---|---|
| १. | मा. मंत्री (कामगार) | अध्यक्ष |
| २ | मा. मंत्री (राउशु) | सदस्य |
| ३ | मा. राज्यमंत्री (कामगार, राउशु) | सदस्य |
| ४ | मा. राधाकृष्ण विखे पाटील, विधान सभा सदस्य. | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ५ | मा. जयंत पाटील, विधान सभा सदस्य. | सदस्य |
| ६ | मा. अतुल भातखळकर, विधान सभा सदस्य. | सदस्य |
| ७ | मा. जयप्रकाश मुंदडा, विधान सभा सदस्य. | सदस्य |
| ८ | मा. अबू आझमी, विधान सभा सदस्य. | सदस्य |
| ९ | मा. अमरजित सिंह पंडित, विधान परिषद सदस्य | सदस्य |
| १० | मा. भाई जगताप, विधान परिषद सदस्य. | सदस्य |
| ११ | मा. डॉ. निलम गो-हे, विधान परिषद सदस्य. | सदस्य |
| १२ | मा. जयंत पाटील, विधान परिषद सदस्य | सदस्य |
| १३ | अपर मुख्य सचिव (राउशु) | सदस्य |
| १४ | प्रधान सचिव (कामगार) | सदस्य |
| १५ | आयुक्त (राउशु) | सदस्य |
| १६ | आयुक्त (कामगार) | सदस्य |

२. उपरोक्त समितीने अहवाल सादर केल्यानंतर राज्यात महापुरुष आणि गड किल्ल्यांची नावे बिअर बार व दारु दुकानांना न देण्याबाबत या विषयी महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८ मध्ये
सुधारणा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करण्यात येईल.

३. या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासन www.maharashtra.govt.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०६०३१५३५२३९९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Pravin Bapurao Gaikwad

Digitally signed by Pravin Bapurao Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pravin Bapurao Gaikwad
Date: 2017.06.03 15:35:48 +05'30'

**( प्रविण गायकवाड )**
कक्ष अधिकारी
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

**प्रत -**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे स्वीय सहायक.
२ मा. मंत्री (राउशु) यांचे स्वीय सहायक.
३ मा. राज्यमंत्री (कामगार, राउशु) यांचे स्वीय सहायक.
४ मा. राधाकृष्ण विखे पाटील, विधान सभा सदस्य.
५ मा. जयंत पाटील, विधान सभा सदस्य.
६ मा. अतुल भातखळकर, विधान सभा सदस्य.

७ मा. जयप्रकाश मुंदडा, विधान सभा सदस्य.
८ मा. अबू आझमी, विधान सभा सदस्य.
९ मा. अमरजितसिंह पंडित, विधान परिषद सदस्य
१० मा. भाई जगताप, विधान परिषद सदस्य.
११ मा. डॉ. निलम गो-हे, विधान परिषद सदस्य.
१२ अपर मुख्य सचिव (राउशु) यांचे स्वीय सहायक.
१३ प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक.
१४ आयुक्त (राउशु), मुंबई.
१५ आयुक्त (कामगार), मुंबई.
१६ उप सचिव (कामगार-१०) यांचे स्वीय सहायक.
१७ निवडनस्ती.